को. प. बंधारा नेपतवळण ता. बारामती, जि. पुणे विशेष दुरूस्ती अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता.

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२४/ (प्र.क्र.१६०/२०२४)/ सिंव्य(कामे)**

मंत्रालय, मुंबई-४०००३२

दिनांक:- १६ मार्च २०२४

**वाचा:-**

१. कार्यकारी संचालक, कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ,पुणे यांचे पत्र.जा.क्र.मकृखोविम १६/(८७/२०२४)/सिंव्य-३ /११३६/२०२४ दिनांक १७/०२/२०२४.
२. शासन निर्णय - २०१७/५६६/१७/सिंव्य(कामे), दि.३१/०८/२०१८.
३. शासन निर्णय - २०१८/५५१/१७/सिंव्य(कामे), दि.२७/११/२०१८.
४. शासन निर्णय - २०१३/७८५/१३/सिंव्य (कामे),दि १/८/२०१९.
५. शासन परिपत्रक- प्रमा २०१३/७८५/१३/ सिंव्य (कामे),दि.१६/९/२०२१.
६. शासन परिपत्रक क्र-प्रमा २०१३/(७८५/१३)/ सिंव्य (कामे),दि १/१/२०१५.
७. शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०२२/प्र.क्र.५१६/२०२२/सिंव्य(कामे) दिनांक १४/०३/२०२३.

**प्रस्तावना:-**

मौजे नेपतवळण ता.बारामती, जि. पुणे या गावच्या परिसरात क-हा नदीवर २८.८६ द.ल.घ.फू साठवण क्षमतेचा कोल्हापुर पद्धतीचा R.C.C बंधारा बांधण्यात आला आहे. बंधा-याची एकुण लांबी १३७ मी. एवढी आहे. या बंधाऱ्यांद्वारे बारामती तालुक्यातील मौजे नेपतवळण, मौजे कऱ्हावागज, अंजनगाव या गावातील एकुण २८४ हे. क्षेत्र सिंचनाखाली येत आहे.

सन २०२० मध्ये कऱ्हा नदीवरच्या नाझरे या धरणाच्या पाणलोट क्षेत्रात व नाझरे धरणाच्या कार्यक्षेत्रात व को. प. बंधारेच्या लाभक्षेत्रामध्ये झालेल्या अतिवृष्टीमुळे दि १४.१०.२०२० ते १७.१०.२०२० व १७.१०.२०२२ रोजी रात्रीस कऱ्हा नदीमध्ये एकुन ७०००० ते ७५००० क्युसेक्स इतका विसर्ग आल्याने कऱ्हा नदीवरील नेपतवळण को. प. बंधा-याचे मोठ्या प्रमाणात नुकसान झालेले आहे. बंधाऱ्याच्या दोन्ही बाजूचे मातीचे भराव वाहून गेले बंधाऱ्याच्या पाणी साठा लवकरच कमी होऊन रब्बी तसेच उन्हाळी हंगामामध्ये लाभक्षेत्रातील पिकांना पुरेसे पाणी उपलब्ध होत नाही. त्यामुळे पिकांच्या वाढीवर विपरित परिणाम होऊन लाभधारक शेतकऱ्यांचे मोठ्या प्रमाणात आर्थिक नुकसान होते. दि.२२/०१/२०२४ रोजी झालेल्या बैठकीत उपस्थित म.कृ.खो.वि.महामंडळाचे मा.कार्यकारी संचालक, मा. मुख्य अभियंता (ज.सं.), पुणे व मा. मुख्य अभियंता (यांत्रिकी ), यांना कऱ्हा नदीवरील १३ को. प. बंधाऱ्याचे नविन्यपूर्ण द्वार बसविण्याकरिता आवश्यक अंदाजपत्रके मंजूरीसाठी सादर करण्याबाबत निर्देश देण्यात आलेले आहे.

सदर नेपतवळण को. प. बंधाऱ्याची कामे पूर्ण होताच को. प. बंधाऱ्याचे मजबुतीकरण होऊन पाण्याची गळती थांबणार आहे. तसेच प्रकल्पीय प्रस्तावित पाणीसाठा पुर्ण क्षमतेने रब्बी व उन्हाळा हंगामात सिंचनासाठी उपलब्ध होणार आहे.

या पार्श्वभुमीवर बंधा-याच्या सुरक्षिततेच्या दृष्टीने बंधा-याची दुरूस्ती होणे आवश्यक असल्याने को. प. बंधारा नेपतवळण ता. बारामती, जि. पुणे या योजनेच्या दुरूस्ती कामास विशेष दुरूस्ती अंतर्गत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णयः-**

महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे अंतर्गत को. प. बंधारा नेपतवळण ता. बारामती, जि. पुणे या योजनेच्या विशेष दुरूस्ती कामाच्या रू ४,९०,८२,७०१/- (रू. चार कोटी नव्वद लक्ष ब्याऐंशी हजार सातशे एक फक्त) एवढ्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता, निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय / परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.
२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.
३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.
४) सदर दुरूस्ती काम सुरु करण्यापूर्वी प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांर्गत पाणी वापर संस्था स्थापित करून काम पूर्ण झाल्यानंतर लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रिय अधिका-यांची राहील.
५) प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.
६) प्रत्यक्ष काम सुरु होण्यापूर्वी Vertical Lift Gate च्या संकल्पनास सक्षम स्तरावर मंजुरी घ्यावी.
७) वंधाऱ्यावरील प्रत्यक्ष सिंचन व पाणीपटटी वाढविण्याबाबत क्षेत्रिय अधिकाऱ्यांनी प्रयत्न करावेत.

प्रस्तावित कामासाठी होणारा खर्च ४७०२ लघु पाटबंधारे प्रकल्प यावरील भांडवली खर्च, ८०-सर्वसाधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका विशेष दुरूस्ती / विस्तार व सुधारणा कार्यक्रमा अंतर्गत भाग भांडवली अंशदान (००)(१५) महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, भाग भांडवली अंशदान (उर्वरीत महाराष्ट्र) (कार्यक्रम) (४७०२ ७४५२) (योजनांतर्गत) ५४ गुंतवणुका या लेखाशिर्षा खाली टाकुन मंजुर अनुदानातुन भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता सिंव्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही मध्ये क्र. ६२ सन २०२३-२४ मध्ये नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय संकेतस्थळावरwww.maharashtra.gov.inउपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक असा २०२४०३१६१३३०२३९६२७ आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT,
2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.16 14:27:56 +05'30'

**(न.गौ.बसेर)**

**शासनाच्या उपसचिव**

**सोबत : सहपत्र**

**प्रत:-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव,

२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

३) मा.उपमुख्यमंत्री (जलसपंदा /वित्त) यांचे प्रधान सचिव,

४) मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई

५) मा.उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन, मुंबई

६) मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

७) मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद ,मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई

८) अ.मु.स. (वित्त) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

९) अ.मु.स. (नियोजन) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१०) अमुस (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

११) सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१२) सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१३) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई,

१४) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा),महाराष्ट्र राज्य,नागपूर,

१५) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे

१६) मुख्य अभियंता (जसं) ,जलसंपदा विभाग ,पुणे

१७) आंतर वित्त सल्लागार व सहसचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,

१८) अधीक्षक अभियंता ,पुणे पाटबंधारे मंडळ, पुणे.

१९) कार्यकारी अभियंता, पुणे पाटबंधारे विभाग, पुणे

२०) सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२४/ (प्र.क्र.१६०/२०२४)/ सिंव्य (कामे),

दि. १६ / ०३ / २०२४ चे सहपत्र

| Sr.No. | Description of Item | Amount in ( Rs. ) |
|---|---|---|
| १ | C - Works (excluding Royalty) | ४००७३६९२ |
| २ | Royalty | १४०६६८० |
| ३ | १ % Insurance | ३८९०६५ |
| ४ | १८ % GST | ७२१३२६४ |
| | Total Rs. | ४,९०,८२,७०१ |

NAMITA GAURAV BASER

Digitally signed by NAMITA GAURAV BASER
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=8ee2809da7de03ff444cfa186d623a75fac5db94fb5c9de45f8a05b5f4b6fb7f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=69D010EE03D01B7C859C5458FEEAF66B1EAE16BC67F5CCB127AE66608DE5FA48, cn=NAMITA GAURAV BASER
Date: 2024.03.16 14:28:19 +05'30'

(न.गौ.बसेर)
शासनाच्या उपसचिव